**वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस मराठी भाषा दिवस म्हणून साजरा करण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०११/प्र.क्र.२३/समन्वय कक्ष**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २५ फेब्रुवारी,२०११**

वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस मराठी भाषा दिवस म्हणून साजरा केला जातो. त्या अनुषंगाने राज्यातील शाळा व महाविद्यालयामध्ये २७ फेब्रुवारी ते ६ मार्च या सप्ताहात मराठी भाषेतील निबंध स्पर्धा, वकृत्व स्पर्धा, चर्चा सत्र, निवोदित कवींना व्यासपीठ मिळण्यासाठी काव्यसंध्या तसेच परिसंवादाचे आयोजन करण्याचे प्रस्तावित आहे. ही बाब लक्षात घेऊन सर्व विभागीय आयुक्त यांना व सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना असे कळविण्यात येते की, वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस मराठी भाषा दिवस म्हणून साजरा करण्यात यावा व त्याप्रित्यर्थ २७ फेब्रुवारी ते ६ मार्च या सप्ताहात जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळा, विद्यालये, उच्च माध्यमिक विद्यालये व महाविद्यालये येथे मराठी भाषेतून निबंध स्पर्धा, वकृत्व स्पर्धा, चर्चा सत्र, निवोदित कवींना व्यासपीठ मिळण्यासाठी काव्यसंध्या तसेच परिसंवादाचे आयोजन करुन २७ फेब्रुवारी हा दिवस मराठी भाषा दिवस म्हणून साजरा करण्यात यावा. यासंदर्भात आपल्या अधिपत्याखालील जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळा, विद्यालये, उच्च माध्यमिक विद्यालये व महाविद्यालये यांना योग्य त्या सूचना देऊन वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा २७ फेब्रुवारी हा दिवस मराठी भाषा दिवस २७ फेब्रुवारी ते ६ मार्च या सप्ताहात साजरा करण्याबाबत तात्काळ सूचना देण्यात याव्यात.

प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईडवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०२२५२१०८२२००१ असा आहे.

(र.ग.सय्यद)
सह सचिव

प्रत,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिष (सर्व)
३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)